**सन २०१९-२० च्या टंचाई अंतर्गत यवतमाळ जिल्हयातील पुसद तालुक्यातील माळपठार ४० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेअंतर्गत नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२०/प्र.क्र. ०२/पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ०२ मार्च, २०२०

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ०३.०२.१९९९

२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/पापु १४, दिनांक ०४.०५.२०१६

३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक :उपआ/विकास/पाणी टंचाई/कावि/०९/२८२२० दिनांक ०२.०१.२०२० व १२.०२.२०२० ची पत्रे.

४) शासन पत्र, क्रमांक: स्थासबै २०२०/प्र.क्र. २१/पापु १४, दिनांक २७.०२.२०२० (बैठकीचे इतिवृत्त)

<u>प्रस्तावना -</u>

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या दिनांक ०२.०१.२०२० च्या पत्रान्वये सन २०१९-२० च्या टंचाई कालावधीसाठी टंचाई उपाययोजने अंतर्गत यवतमाळ जिल्हयातील पुसद तालुक्यातील माळपठार ४० गावे प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजनेअंतर्गत नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्तीचा रुपये १६३.४९ लाख किंमतीचा प्रस्ताव प्रशासकीय मंजूरीकरिता शासनास सादर केला आहे.

पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना/उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या स्थायी

समितीच्या दिनांक २६.०२.२०२० रोजी झालेल्या बैठकीत या प्रस्तावावर सविस्तर चर्चा होऊन अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट जूनी व कालबाहय झालेली पंपिंग मशीनरी बदलण्यासाठी समाविष्ट असलेल्या प्रस्तावास मंजूरी देण्यात आली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन यवतमाळ जिल्हयातील पुसद तालुक्यातील माळपठार ४० गावे प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजनेअंतर्गत नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावाअंतर्गत प्रस्तावित करण्यात आलेल्या कामांचा समावेश असलेल्या रुपये १६३.४९ लाख (रुपये एक कोटी त्रेसष्ट लाख एकोणपन्नास हजार फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून टंचाई अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी पुसद तालुक्यातील संबंधित गावांत पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्वप्रथम घोषित करावे.

२) सदर प्रस्तावात नमूद केलेली सर्व विशेष दुरुस्तीची कामे कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, यवतमाळ यांचेमार्फत राबविण्यात यावी.

३) सदर योजनेची कामे विहित पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत. योजनेचे काम मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

४) सदरील योजनेवरील निविदा प्रक्रिया माहे मार्च २०२० अखेरीस पूर्ण करावी.

५) योजनेची कामे दिनांक ३० एप्रिल, २०२० पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.

६) माहे दि. ३० एप्रिल, २०२० पर्यंत योजना पूर्ण न झाल्यास योजनेची प्रशासकीय मान्यता रद्द समजण्यात येईल.

७) सदरील योजनेंतर्गत १०० % कुटुंबाना वैयक्तिक नळ जोडणी देण्याची कार्यवाही करावी. सदरील अटींची पुर्ततेच्या अधीनतेने सदरील योजना मंजूर करण्यात येत आहे. त्यादृष्टीने ग्रामपंचायत, जिल्हा परिषद, पंचायत समिती यांच्याकडून ठराव प्राप्त करावेत व त्यानुसार कार्यवाही करावी.

८) सदरील कामे पूर्ण होताच योजना जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्याच्या अधिनतेने प्रस्तुत नळ योजना विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

९) सदर योजनेकरिता निविदा प्रक्रिया झाल्यानंतर योजनेच्या सुरुवातीला ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा. निधीची मागणी संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर सीबीडी, नवी मुंबई यांच्या मार्फत शासनास सादर करावी.

१०) योजनेचे काम मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनेच्या निविदा प्रक्रियेपासून ते योजनेतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत दर महिना प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

**२. याकरिता होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना/ उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या सचिवस्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २६.०२.२०२० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०२१५३७५६२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.03.02 18:21:33 +05'30'

**(गणेश पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
८. विभागीय आयुक्त, अमरावती

९. जिल्हाधिकारी, यवतमाळ
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
११. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर सीबीडी, नवी मुंबई.
१२. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अमरावती
१३. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, यवतमाळ
१४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ
१५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१६. सह सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१७. पापु १४ (निवडनस्ती)